राज्य योजना सन २०१५-१६
**वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणा संबंधीत आवश्यक ती बांधकामे करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-०६१५/प्र.क्र.१६८/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ जून, २०१५

वाचा :-

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४२/(१५-१६)/२९९, दिनांक :- २८.०५.२०१५.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-वजी/२२(६)/योजना/प्र.क्र. ३२/ १५-१६/८२१, दिनांक ०४.०६.२०१५.

प्रस्तावना :-

सन २०१५-१६ राज्यस्तरीय योजनेतंर्गत योजनेअंतर्गत वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ९००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु. ६३०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सबब, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी रु. ४५१.२४ लक्षचा प्रस्ताव सादर केलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रक क्रमांक २ अन्वये सन २०१५-१६ करीता योजनेअंतर्गत वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) मधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत निधी माहे नोव्हेंबर, २०१५ पर्यत खर्च करण्यास **" अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा., नागपूर यांना सादर केलेल्या प्रस्तावातील अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुर्व, नागपूर यांचेकडील **अ)** मेळघाट व्याघ्र प्रकल्प, **ब)** काटेपूर्णा व **क)** ज्ञानगंगा ह्या संरक्षित क्षेत्रातील कामांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे. (रु. ६१.६५ लाख) तसेच अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक यांचेकडील प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे (रु. १२८.६० लाख). उर्वरीत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त नाही.

सदर शासन निर्णयान्वये रु. १९०.२५ लक्ष (रु.६१.६५ लक्ष + रु. १२८.६० लक्ष = रु. १९०.२५ लक्ष) निधी खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१५-१६ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव राज्य योजनांतर्गत योजना (००) (११) वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

४. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

६. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११५०७१५४६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.06.11 15:08:55 +05'30'

(अरविंद आपटे)
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई/ पूर्व, नागपूर/ नाशिक.

५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.

६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.

७. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.

८. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.

९. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.

१०.महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.

११.ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६१५/प्र.क्र.१६८/फ-१, दिनांक ११ जून, २०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.**

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष २४०६-२२२१ | जून, २०१५ | जुलै, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ०२-मजूरी | २२.८४ | ३०.०० | ५२.८४ |
| २ | २१-पुरवठा व सामुग्री | ६७.४१ | ७०.०० | १३७.४१ |
| एकूण | | ९०.२५ | १००.०० | १९०.२५ |

****